<u>यशवंत पंचायत राज अभियान - २०१४-१५</u>
**राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषद, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींना विभाग व राज्यस्तरावर पुरस्कार प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१४/प्र.क्र. ९१/पंरा-१

बांधकाम भवन, तळमजला, २५ मर्झबान रोड, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०३ मार्च, २०१५

**<u>वाचा-</u>**

1. **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१३/प्र.क्र.१४३/पंरा-१, दिनांक २३ सप्टेबर, २०१३**
2. **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः झेडपीए २०१३/प्र.क्र.१४३/पंरा-१, दिनांक ७ नोव्हेंबर, २०१३**
3. **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१४/प्र.क्र.९१/पंरा-१, दिनांक २६ ऑगस्ट, २०१४**
4. **शासन परिपत्रक क्रमांकः झेडपीए २०१३/प्र.क्र.१४३/पंरा-१, दिनांक १६ डिसेंबर, २०१४**
5. **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः झेडपीए २०१४/प्र.क्र.९१/पंरा-१, दिनांक २३ डिसेंबर, २०१४**
6. **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः झेडपीए २०१४/प्र.क्र.९१/पंरा-१, दिनांक ३ जानेवारी, २०१५**
7. **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः झेडपीए २०१४/प्र.क्र.९१/पंरा-१, दिनांक ५ जानेवारी, २०१५**

## शासन निर्णय-

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान मोठे आहे. राज्यामधील विकासाच्या प्रमुख योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. तेव्हा पंचायत राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करुन त्यांची कार्यक्षमता अधिक वाढविणे व त्यांच्यामध्ये उत्कृष्ट कामांची स्पर्धा निर्माण करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यात पंचायत राज संस्थांचे व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तर व राज्यस्तरावर “यशवंत पंचायत राज अभियान” ही पुरस्कार योजना सुरु करण्यात आलेली आहे. सन २०११-१२ पासून पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी पंचायत राज व्यवस्थेच्या सक्षमीकरणासाठी काम करणाऱ्या राज्यांना तसेच राज्यातील पंचायत राज संस्थांना प्रोत्साहन देण्यासाठी " पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व प्रोत्साहन योजना" (PEAIS) सुरु केली आहे. केंद्र शासनाने या योजनेचा १२ पंचवार्षिक योजनेत राबवित असलेल्या राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियानात या योजनेचा समावेश

केला आहे. राज्य पुरस्कृत "यशवंत पंचायत राज अभियान" व केंद्र पुरस्कृत " राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण योजना" यांचा उद्देश एकच असल्याने ह्या दोंन्ही योजना राज्य शासनाकडून एकत्रितपणे राबविण्यात येत आहेत.

पंचायत राज प्रशासन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायती यांनी सन २०१३-२०१४ या आर्थिक वर्षामध्ये केलेल्या कामाचे मूल्यमापन विचारात घेऊन विभागस्तर व राज्यस्तर अशा दोन स्तरावर यशवंत पंचायत राज अभियान ही अभिनव पुरस्कार योजना यावर्षी देखील राबविण्यात येत आहे. राज्यातील अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा, तीन पंचायत समित्या व तीन ग्रामपंचायतींची पुरस्कारासाठी राज्यस्तरावर निवड करण्यात येते.तसेच विभागस्तरावर तीन ग्रामपंचायती व तीन पंचायत समित्यांची पुरस्कारासाठी निवड करण्यात येते. सदर निवड करण्यासाठी तालुकास्तरावर, जिल्हास्तरावर, विभागस्तरावर आणि राज्यस्तरावर पारितोषिक निवड समितीची स्थापना करण्यात आलेली होती. याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ व शासन शुध्दीपत्रक ७ नोव्हेंबर, २०१३ व शासन निर्णय क्रमांक २६ ऑगस्ट, २०१४ अन्वये देण्यात आल्या होत्या.

विभागस्तरीय पारितोषिक निवड समितीने शिफारस केलेल्या प्रत्येक विभागातून प्रथम आलेल्या ६ ग्रामपंचायती (एकूण ३६), विभागातून प्रथम क्रमांकाच्या पंचायत समित्या (एकूण ६) व विभागातून प्रथम क्रमांकाच्या जिल्हा परिषदांच्या (एकूण ६) प्रस्तावांची प्रत्यक्षदर्शी पडताळणी करण्यासाठी संदर्भाधिन शासन परिपत्रक, दिनांक १६ डिसेंबर, २०१४, शासन शुध्दीपत्रक दिनांक २३ डिसेंबर, २०१४, शासन शुध्दीपत्रक दिनांक ३ जानेवारी, २०१५ व शासन शुध्दीपत्रक ५ जानेवारी, २०१५ अन्वये राज्यस्तरीय पडताळणी समितीची स्थापना करण्यात आली होती. राज्यस्तरीय पडताळणी समितीने सदर पंचायत राज संस्थांची प्रत्यक्षदर्शी तपासणी करुन शासनास अहवाल सादर केला होता. राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीने, राज्यस्तरीय पडताळणी समितीकडून प्राप्त झालेल्या अहवालावर अभ्यास करुन प्रत्येक विभागातील तीन पंचायत समित्या याप्रमाणे अठरा पंचायत समित्या आणि प्रत्येक विभागातून तीन ग्रामपंचायती याप्रमाणे अठरा ग्रामपंचायतींची निवड विभागस्तरावर तसेच अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा, तीन पंचायत समित्या व तीन ग्रामपंचायतींची निवड राज्यस्तरावर प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या पुरस्कारासाठी केली. विभागस्तर व राज्यस्तर पुरस्कारासाठी निवड झालेल्या पंचायत राज संस्थांची नावे खालीलप्रमाणे आहेत.

## पंचायत समिती विभागस्तर

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | कोकण | पंचायत समिती देवगड, जिल्हा सिंधुदुर्ग | प्रथम पारितोषिक | रु.१०,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती मालवण, जिल्हा सिंधुदुर्ग | द्वितीय पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती वेंगुर्ला, जिल्हा सिंधुदुर्ग | तृतीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | नाशिक | पंचायत समिती राहाता, जिल्हा अहमदनगर | प्रथम पारितोषिक | रु.१०,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती श्रीरामपूर, जिल्हा अहमदनगर | द्वितीय पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती नाशिक, जिल्हा नाशिक | तृतीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | पुणे | पंचायत समिती कागल, जिल्हा कोल्हापूर | प्रथम पारितोषिक | रु.१०,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती गडहिंग्लज,, जिल्हा कोल्हापूर | द्वितीय पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती कराड, जिल्हा सातारा. | तृतीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४ | औरंगाबाद | पंचायत समिती रेणापूर, जिल्हा लातूर | प्रथम पारितोषिक | रु.१०,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती हिंगोली, जिल्हा हिंगोली | द्वितीय पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती औसा, जिल्हा लातूर | तृतीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ५ | अमरावती | पंचायत समिती चांदूर रेल्वे, जिल्हा अमरावती | प्रथम पारितोषिक | रु.१०,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती अमरावती, जिल्हा अमरावती | द्वितीय पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती चांदूर बाजार, जिल्हा अमरावती. | तृतीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ६ | नागपूर | पंचायत समिती ब्रम्हपूरी, जिल्हा चंद्रपूर | प्रथम पारितोषिक | रु.१०,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती तिरोडा, जिल्हा गोंदिया | द्वितीय पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | पंचायत समिती कामठी, जिल्हा नागपूर. | तृतीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

**ग्रामपंचायती (विभागस्तर)**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | **कोकण** | ग्रामपंचायत परुळे-बाजार, ता.वेंगुर्ला , जि. सिंधुदुर्ग | प्रथम पारितोषिक (संयुक्त) | रु.२,५०,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत चांदोरे, ता.माणगाव , जि. रायगड | | रु.२,५०,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत आंजणारी, ता. लांजा, जि. रत्नागिरी | तृतीय पारितोषिक | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | **नाशिक** | ग्रामपंचायत लोणी बु., ता. राहाता , जि. अहमदनगर | प्रथम पारितोषिक | रु.३,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत दरी, ता. नाशिक , जि. नाशिक | द्वितीय पारितोषिक | रु.२,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत उभाडे, ता. ईगतपूरी जि. नाशिक | तृतीय पारितोषिक | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | **पुणे** | ग्रामपंचायत मान्याचीवाडी, ता. पाटण, जि.सातारा | प्रथम पारितोषिक | रु.३,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत , कोकरुड, ता. शिराळा, जि. सांगली | द्वितीय पारितोषिक | रु.२,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत ठिकेकरवाडी, ता. जुन्नर, जि. पुणे. | तृतीय पारितोषिक | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४ | **औरंगाबाद** | ग्रामपंचायत झरी, ता. लोहा, जि. नांदेड | प्रथम पारितोषिक | रु.३,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत कुंभेफळ, ता. जि. औरंगाबाद. | द्वितीय पारितोषिक | रु.२,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत तलमोड, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | तृतीय पारितोषिक | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ | **अमरावती** | ग्रामपंचायत चेनुष्टा, ता. तिवसा, जि.अमरावती | प्रथम पारितोषिक | रु.३,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत धाबा, ता. बार्शीटाकळी, जि. अकोला | द्वितीय पारितोषिक | रु.२,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत यावली शहिद, ता.जि. अमरावती | तृतीय पारितोषिक | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ६ | **नागपूर** | ग्रामपंचायत महालगांव, ता. कामठी, जि. नागपूर | प्रथम पारितोषिक | रु.३,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत शिवनी मोगरा, ता. लाखणी, जि. भंडारा | द्वितीय पारितोषिक | रु.२,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | ग्रामपंचायत निळज, ता.ब्रम्हपूरी, जि. चंदुपूर | तृतीय पारितोषिक | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

## जिल्हा परिषद (राज्यस्तर)

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद, कोल्हापूर | प्रथम पारितोषिक | रु.२५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | जिल्हा परिषद, नाशिक | द्वितीय पारितोषिक | रु.१५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग | तृतीय पारितोषिक | रु.१०,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

## पंचायत समिती (राज्यस्तर)

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पंचायत समिती, रेणापूर , जि. लातूर | प्रथम पारितोषिक | रु.१५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | पंचायत समिती, देवगड, जि. सिंधुदुर्ग | द्वितीय पारितोषिक | रु.१२,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | पंचायत समिती, कागल, जि. कोल्हापूर | तृतीय पारितोषिक | रु.१०,००,०००/-/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

**ग्रामपंचायत (राज्यस्तर)**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ग्रामपंचायत,मान्याचीवाडी ता.पाटण, जि. सातारा | प्रथम पारितोषिक | रु.७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | ग्रामपंचायत लोणी बु., ता. राहता, जि. अहमदनगर | द्वितीय पारितोषिक | रु.५,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | ग्रामपंचायत परुळेबाजार, ता.वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग | तृतीय पारितोषिक (संयुक्त) | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४ | ग्रामपंचायत चांदोरे, ता.माणगाव, जि.रायगड | | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ५ | ग्रामपंचायत झरी, ता.लोहा, जि.नांदेड | | रु.१,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

यशवंत पंचायत राज अभियान कार्यक्रम दिनांक १५ मार्च, २०१५ रोजी यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, जनरल जगन्नाथराव भोसले मार्ग, मुंबई- ४०० ०२१ येथे आयोजित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३१४४०१६८४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Vishvambhar Gujar

Digitally signed by Vivek Vishvambhar Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vivek Vishvambhar Gujar
Date: 2015.03.04 11:15:56 +05'30'

(व्ही. व्ही गुजर)
उपसचिव महाराष्ट्र शासन

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उप मुख्यमंत्री याचे सचिव
४) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
६) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
७) मा. विधानसभा/ मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)
८) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
९) मा. प्रधान सचिव (जलसंधारण).

१०) विभागीय आयुक्त (सर्व).
११) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधनी, बाणेर रोड, पुणे.
१२) उप सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता).
१३) उप सचिव (संग्राम कक्ष), ग्राम विकास विभाग, मुंबई.
१४) उप सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (सार्वजनिक आरोग्य), मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य, राष्ट्रीय ग्रामीण जीवन्नोत्ती अभियान
१७) प्रकल्प संचालक (प्राथमिक शिक्षण परिषद)
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१८) प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र/ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र/ संयुक्त प्रशिक्षण केंद्र (सर्व)
१९) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.